**शुभमनगर सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), वलवाडी, जिल्हा धुळे या संस्थेचा भूखंड गहाणमुक्त करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. घबांक-१७१८/प्र.क्र.६७२/१८-स,**
न्यु इंडीया ॲश्युरन्स बिल्डिंग, ३ रा मजला,
महात्मा गांधी मार्ग, बँक ऑफ इंडीयासमोर, मुंबई :- ४०० ००१.
दिनांक :- ०७ जून, २०१८

<u>संदर्भ :-</u> १) शासन निर्णय कृषि व सहकार, विभाग क्र.एचएसजी-१०८८/६२३/१८-सी दिनांक :- २३/३/८८, २८/१०/८८, २८/०२/८९, १७/०५/८९, ०९/११/८७ २०/०५/९१, व २९/०३/९३
२) शासन निर्णय क्र.एचएसजी १०६७/XXIV/ ६ डिसेंबर १९६७
३) संस्थेचा प्रस्ताव दिनांक ०६/१२/२०१७

<u>प्रस्तावना :-</u>

शुभमनगर सहकारी गृहनिर्माण संस्था (म.), वलवाडी, जिल्हा धुळे या संस्थेतील एकुण ३० पात्र सभासदांना संदर्भ क्र.१ येथील एकुण सात शासन निर्णयान्वये वाढीव कर्जासह एकूण कर्ज रु.१९,८१,२६८/- (रु. एकोणवीस लाख एक्याऐंशी हजार दोनशे अडूसष्ट फक्त) इतके कर्ज मंजूर करण्यात आले होते. संदर्भ क्र.३ येथे संस्थेने सादर केलेल्या प्रस्तावानुसार तसेच सर्व ३० कर्जदार सभासदांनी त्यांना वितरीत केलेली कर्जाची रक्कम त्यावरील व्याजासह शासनास परतफेड केली आहे. तसेच सर्व सभासदांना निर्गमित केलेल्या ना देय प्रमाणपत्रांवरुन कर्ज व त्यावरील व्याजाची वसूली झाल्याचे या कार्यालयातील नोंदीवरून दिसून येत आहे. संस्थेकडे शासनाचे येणे बाकी नसल्यामुळे संस्थेचा भूखंड गहाणखतातून मुक्त करण्याचा संस्थेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर बाब विचारात घेऊन शासन आता खालीलप्रमाणे आदेश देत आहे:-

**शासन निर्णय :-**

शुभमनगर सहकारी गृहनिर्माण संस्था (मर्या.) , वलवाडी, जिल्हा धुळे या संस्थेच्या एकूण ३० सभासदांना वितरीत करण्यात आलेले गृहबांधणी कर्ज रु.१९,८१,२६८/- (रु. एकोणवीस लाख एक्याऐंशी हजार दोनशे अडूसष्ट फक्त) व त्यावरील संपूर्ण रक्कम व्याजासह शासनास परतफेड केली आहे, सदर संस्थेकडे शासनाचे कोणतेही येणे बाकी नसल्याने संस्थेने शासनाकडे गहाण ठेवलेला मु. पोस्ट वलवाडी, जिल्हा धुळे येथील गट क्र. १३४/२ मधील खालीलप्रमाणे चतु:सिमा असलेला ४६,५७९ चौ.मी क्षेत्रफळ असलेला संस्थेचा भूखंड व त्यावरील बांधकाम गहाणखतातून मुक्त करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| पुर्वेकडे | : | नाकाने रोड, गट क्र. १३५, वलवाडी |
| पश्चिमकडे | : | गट क्र. १३४/१, वलवाडी |
| उत्तरेकडे | : | गट क्र. १३९, वलवाडी |
| दक्षिणेकडे | : | गट क्र.१३३, वलवाडी |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०६०७१२५१०७१७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Shankar Bhujbal

Digitally signed by Ashok Shankar Bhujbal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d0603fd89ef561b0b051d6283b2c15bb82dcdd5e5dfe04798b8f19ffa9581722, cn=Ashok Shankar Bhujbal
Date: 2018.06.07 16:55:17 +05'30'

**( अ.शं.भुजबळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती).
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरीक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता) (२ प्रती).
३) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पूणे.
६) संचालक, विमा संचालनालय, मुंबई गृहनिर्माण भवन (म्हाडा), खोली क.२६४, पहिला माळा, वांद्रे (पूर्व), मुंबई :- ४०० ०५१.
७) जिल्हाधिकारी, धुळे.
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था धुळे.
९) जिल्हा विशेष लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, धुळे.
१०) सहायक निबंघक, सहकारी संस्था, ता.जि.धुळे.
११) अध्यक्ष/सचिव, शुभमनगर सहकारी गृहनिर्माण संस्था, (म.), वलवाडी जिल्हा धुळे
१२) निवडनस्ती १९-स.